आकस्मिकता निधीतून आगाऊ रकमेची मागणी व विनियोग यासंदर्भातील कार्यवाहीबाबत........

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः आकनि-२०१५/प्र.क्र.९८/अर्थ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

तारीख: ३ जून, २०१५

**परिपत्रक**

आकस्मिकता निधी राज्याच्या लेख्याचा एक स्वतंत्र भाग असून या निधीतून आगाऊ रकमेची मागणी केव्हा व कशी करावी, तसेच मागणीच्या समर्थनार्थ कोणत्या बाबीची/अटींची पूर्तता करावी, आकस्मिकता निधीची भरपाई कशी करावी या सर्व बाबींचा उहापोह महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका खंड १ मधील प्रकरण १६ तसेच परिशिष्ट १२ मध्ये केलेला आहे. तसेच आकस्मिकता निधीतील आगाऊ रकमेच्या अनियमिततेच्या अनुषंगाने दिनांक २६ एप्रिल, १९८३ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. असे असले तरी आकस्मिकता निधीतून आगाऊ रकमेची मागणी व विनियोगासंबंधी महालेखापाल कार्यालय तसेच लोकलेखासमिती यांचेकडून वारंवार आक्षेप येत आहेत. या अनुषंगाने आकस्मिकता निधीतून आगाऊ रकमेची मागणी व विनियोगासंबंधी भविष्यात अनियमततेची पुनरावृत्ती होऊ नये, यास्तव पुन्हा सूचना देणे गरजेचे झाले आहे.

२. अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील तरतूदीनुसार मंजूर अनुदान किंवा विनियोजन यापेक्षा अधीक किंवा अर्थसंकल्पात समाविष्ट नसलेली नवीन सेवा यावर तातडीने अकल्पीत खर्च करण्याची गरज निर्माण होते आणि मागणी करण्यात आलेल्या आगाऊ रकमेचा, तिची भरपाई होण्यापूर्वी संपूर्णपणे विनियोग करण्याचा वाजवी संभव असतो आणि पुरक मागणी मतास टाकण्यास व संबंधित विनियोजन विधेयक मंजूर होण्यास पुरेसा अवधी नसतो, तेव्हाच असा खर्च करण्यापूर्वी आकस्मिकता निधीमधून आगाऊ रक्कम घेण्याची तरतूद आहे.

३. अर्थसंकल्प नियम पुस्तिकेतील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागाने आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम मंजूरीचा प्रस्ताव पाठवितांना खालील बाबींचे समर्थन / पुर्तता करणे आवश्यक आहे :-

(अ) ज्या परिस्थितीत वार्षिक किंवा पुरक अर्थसंकल्पात तरतूद करता आली नसेल, खर्चाची पुर्वापेक्षा करता आली नसेल आणि विधानमंडळाची आवश्यक ती मान्यता मिळेपर्यंत खर्च लांबणीवर टाकणे शक्य नसेल तेव्हाच अशा परिस्थितीचे समर्थन करणे आवश्यक आहे.

(ब) प्रशासकीय मान्यता, तांत्रिक मंजूरी, जागेची निवड या सारख्या प्राथमिक गोष्टी पूर्ण करणे आवश्यक आहे.

(क) आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम प्रस्ताव पाठविताना आगाऊ रकमेचा अपेक्षित खर्च त्याच अनुदानाच्या मागणी क्रमांकाखाली बचतीमधून भागविता येणे शक्य आहे किंवा कसे याचा तपशील देण्यात यावा. बचत उपलब्ध होत नसल्यास तसे प्रमाणित करण्यात यावे.

(ड) आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम मिळविण्याच्या प्रस्तावामध्ये प्रस्तावाचा एकूण खर्च, आगाऊ रकमेमधून भागवावयाचा खर्च, वर्षाच्या उर्वरित कालावधीचा खर्च, योजना चालू वित्तीय वर्षानंतरही सुरु रहाणार असेल तर त्याचा वार्षिक खर्च, केंद्र व इतर संस्थाकडून वित्तीय सहाय्य/ कर्जे मिळणार असल्यास त्याचा तपशील तसेच खर्चाच्या अनुषंगाने लेखाशीर्षाचे मागणी क्रमांक ते उद्दिष्टनिहाय पर्यंत वर्गीकरण इत्यादी बाबींचा समावेश असणे आवश्यक आहे.

(इ) आकस्मिकता निधीतून घेतलेल्या आगाऊ रकमेचा पुरक अनुदानाद्वारे आगाऊ रकमेची भरपाई करण्यात येण्यापूर्वी पूर्णपणे विनियोग केला जाण्याची खात्री व तसे प्रमाणित करणे आवश्यक असून आगाऊ रकमेची भरपाई करण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करणे ही प्रशासकीय विभागाची जबाबदारी आहे.

(ई) आकस्मिकता निधीतून काढण्यात आलेल्या आगाऊ रकमा व त्यासंबंधात होणाऱ्या खर्चाच्या प्रगतीवर लक्ष ठेवणे व त्याबाबतची माहिती विहित कालावधीत व नमुन्यात वित्त विभाग व महालेखापाल कार्यालयाला देणे याची सर्वस्वी जबाबदारी नियंत्रक अधिकारी/प्रशासकीय विभागाची आहे. तथापि प्रशासकीय विभागामार्फत आकस्मिकता निधी अग्रीमाचा प्रस्ताव सादर केल्यानंतर त्याबाबतचा पाठपुरावा न करणे, त्रुटींची/आवश्यक माहितीची पूर्तता विलंबाने करणे तसेच मंजूर केलेल्या आकस्मिकता निधी आगाऊ रक्कम वाटपाचे आदेश काढण्यास प्रदिर्घ विलंब होणे यामुळे आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम घेण्याच्या मुळ तत्वाला/नियमाला बाधा येत असून अशी वित्तीय अनियमितता टाळण्यात यावी.

४. वरील सूचना लक्षात घेऊन आकस्मिकता निधीतून आगाऊ रकमा मागणीचा प्रस्ताव प्रशासकीय विभागाने काटेकोरपणे तपासणे व या आगाऊ रकमेचा सकारात्मक आणि अपरिहार्यपणे लगेचच खर्च करणे आवश्यक राहील. या ठिकाणी असेही निर्दशनास आणण्यात येते की, लोकलेखा समितीचा सन २००७-२००८ चा नववा अहवाल अकराव्या विधानसभेमध्ये सादर झालेला असून सदर अहवालामध्ये लोकलेखा समितीने सन २०००-२००१ व २००१-२००२ या वर्षाच्या विनियोजन लेखा व लेखापरिक्षक अहवालासंबंधी अभिप्राय व शिफारशी केलेल्या आहेत. या अहवालातील २.१३ या

परिच्छेदात सहकार विभागाने खाजगी संस्थेस आकस्मिकता निधीतून पैसे उपलब्ध करुन दिल्यानंतरही सदर संस्था सुरु न झाल्यामुळे शासनाचा पैसा वाया गेला व आर्थिक शिस्त मोडीत काढली त्यामुळे खाजगी संस्थेसाठी आकस्मिकता निधीतून रक्कम काढण्याची प्रथा अयोग्य असून अशा प्रकारे आकस्मिकता निधीतून पैसे काढण्याच्या प्रवृत्तीला परिणामकारक पायबंद घालण्याचे दृष्टीने वित्त विभागाने कठोर पावले उचलावीत व त्याअनुषंगाने केलेल्या कार्यवाहीची माहिती समितीस कळविण्यात यावी, अशी शिफारस केली आहे.

५. या संदर्भात सर्व प्रशासकीय विभागांना असे कळविण्यात येते की, खाजगी संस्थाना आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम मंजूरीचा प्रस्ताव शक्यतो सादर करु नयेत. अपवादात्मक परिस्थितीत सादर केल्यास तो सादर करताना वरील परिच्छेद ३ मधील नमूद अटींची काटेकोरपणे तपासणी करावी. विशेषत: खाजगी संस्थाना आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम देतांना शासनाच्या सदर निधीचा विनियोग सकारात्मक व अपरिहार्यपणे लगेच होण्याच्या दृष्टीने सर्वतोपरी दक्षता घ्यावी. तसेच खाजगी संस्थांना अशा आगाऊ रकमेची शिफारस करतांना दिलेला निधी भविष्यात शासनास महसूलाच्या रुपाने राज्याच्या विकासात्मक कामांसाठी वसूल/कामी येईल याबाबत बंधने घालता येतील का? यादृष्टीने प्रस्तावाची तपासणी करावी.

६. वरील सर्व नियम/अटींचे पालन करुनच यापुढे प्रशासकीय विभागांनी आकस्मिकता निधीमधून आगाऊ रक्कम मंजूरीचे प्रस्ताव पाठविण्यात यावेत. वरील नियम/अटी/सूचना यांचे पालन न करता आकस्मिकता निधीमधून आगाऊ रक्कम घेण्यासंदर्भात केलेली वित्तीय अनियमितता व आर्थिक शिस्त मोडीत काढणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करुन त्यांचेवर शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०५१३५८१२७३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Narayan Bhosale

Digitally signed by Ashok Narayan Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d40850c6db60734c4acd1f5455264095b6839b2fd94fa7c0ad1b12bcab7f8fbb, cn=Ashok Narayan Bhosale
Date: 2015.06.05 14:00:21 +05'30'

(अ. ना. भोसले)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. सर्व सह सचिव / उप सचिव ( अर्थसंकल्प शाखा ), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (व्हीएलसी शाखा) महाराष्ट्र, मुंबई.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा) महाराष्ट्र, नागपूर.

६. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई.

७. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, नागपूर.

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

११.वित्त विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी.

१२.निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.